सन २०१८-१९ च्या खरीप हंगामातील दुष्काळ सदृश्य तालुक्यातील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे परीक्षा शुल्क माफ करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उच्च व तंत्र शिक्षण विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः शुल्क-५२१८/प्र.क्र.४१३/मशि-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १७ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :-**

(१) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र.एफईडी-१५९२/१२०२/(११३२)/साशि-५, दिनांक १८.१०.१९९३.

(२) महसूल व वन विभाग शासन निर्णय, क्र.एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७, दिनांक २३ ऑक्टोबर, २०१८.

(३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८.

(४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन परिपत्रक, क्र.शुल्क-५२१८/प्र.क्र.४१३/मशि-२, दिनांक ०३ नोव्हेंबर, २०१८.

(५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७, दिनांक ०६ नोव्हेंबर, २०१८.

**शासन परिपत्रक :-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील टंचाईग्रस्त भागातील विद्यार्थ्यांची विद्यापीठ व परीक्षा मंडळे यांची परीक्षा फी माफ करण्याची योजना लागू केली आहे. यामध्ये अकृषी विद्यापीठांकडून घेण्यात येणाऱ्या परीक्षांचा समावेश आहे. त्यानुसार महसूल व वन विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील दुष्काळ सदृश्य परिस्थिती जाहीर केलेल्या १८० तालुक्यांमधील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे परीक्षा शुल्क माफीसंबंधी कार्यवाही करण्याच्या सूचना संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना संदर्भ क्र.४ येथील दिनांक ०३ नोव्हेंबर, २०१८ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

२. आता, महसूल व वन विभागाकडून दिनांक ०६ नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये, राज्यातील २६८ महसुली मंडळामध्ये दुष्काळ घोषित करुन काही सवलती लागू करण्यात आल्या आहेत. सदर सवलतींमध्ये "शालेय/महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या परीक्षा शुल्कात माफी" या सवलतीचा समावेश आहे. यास्तव दुष्काळ घोषित केलेल्या २६८ महसुली मंडळातील उच्च शिक्षण घेणाऱ्या महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी परीक्षा शुल्क माफीसंबंधी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार तात्काळ कार्यवाही करण्यात यावी. यासाठी आवश्यक असल्यास निधीची तरतूद करण्यासाठी संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तातडीने प्रस्ताव सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११७१२५३१०५६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hariram V Parhate

Digitally signed by Hariram V Parhate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=8bfd656b321bf6c348564562d46cd2934b62b770484625206559a2c204e56cb8, serialNumber=d01f16685aedf1abc9cfd58347280b4c4cb8d304afd1d413884ef4d91aa1462d, cn=Hariram V Parhate
Date: 2018.11.17 13:00:25 +05'30'

**(ह. व्यं. पऱ्हाते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व जिल्हाधिकारी,
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण (संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत),
४. सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. उप सचिव (म-७), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. कार्यासन अधिकारी (मशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. निवडनस्ती (मशि-२).